श्री. श्रीकांत मारुतीराव देशमुख, सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पकानि-१५१६/१८९३/प्र.क्र.३१५/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १८ जून, २०१८.

**पहा :-**
१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२/१३/१०३०/प्र.क्र.१७६/नवि-२७, दि.०४.०३.२०१४.
२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश क्र.आस्था/गट-अ/ससंनर/ना.नि./प्रशा-१/११९९, दि.०४.०३.२०१४.
३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/श्रीमादे-ससंनर/परिविक्षा/प्रशा-१ब/५६९८, दि.२१.१०.२०१६.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि/३०२.क्र.प्र/२७१५-आठ, दि.२९.०२.२०१६.
५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/श्रीमादे-ससंनर/परिविक्षा/प्रशा-१ब/३४४२, दि.०५.०६.२०१८.

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागाच्या संदर्भाधिन दि.०४.०३.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्री. श्रीकांत मारुतीराव देशमुख, तत्कालीन नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५,६००-३९,१००+ग्रेड पे रु.६,६००) पदावर ०२ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीकरिता सरळसेवेने नियुक्ती करण्यात येऊन सातारा शाखा, सातारा कार्यालयातील "सहायक संचालक, नगर रचना" पदावर पदस्थापना करण्यात आली होती. नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या संदर्भाधिन दि.०४.०३.२०१४ रोजीच्या कार्यकारी आदेशान्वये ते उक्त पदावर दि.०६.०३.२०१४ (म.पू.) रोजी हजर झाले होते.

**०२.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या संदर्भाधिन दि.२१.१०.२०१६ व दि.०५.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये श्री. श्री. मा. देशमुख, सहायक संचालक, नगर रचना यांचा ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "सहायक संचालक, नगर रचना पदावर "(राजपत्रित/गट-अ )" नियमित नियुक्ती करण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केला आहे.

**०३.** श्री. श्री. मा. देशमुख, सहायक संचालक, नगर रचना, सातारा शाखा, सातारा यांचा ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.०६.०३.२०१४ (म.पू.) पासून सुरु होऊन दि.०५.०३.२०१६ रोजी समाप्त होणे अपेक्षित होते. तथापि, त्यांनी परिविक्षा कालावधीत ३१ दिवसांची रजा उपभोगली असल्याने त्यांचा परिविक्षा कालावधी दि.०६.०३.२०१६ पासून पुढे ३१ दिवसांनी वाढून दि.०५.०४.२०१६ (म.नं.) रोजी संपुष्टात येईल.

०४. सबब, श्री. श्री. मा. देशमुख, सहायक संचालक, नगर रचना यांचा ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५,६००-३९,१००+ग्रेड पे रु.६,६००) पदावर नियमित नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. श्रीकांत मारुतीराव देशमुख, सहायक संचालक, नगर रचना, सातारा शाखा, सातारा "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदाच्या सेवाप्रवेश नियमातील अटी व शर्तीची तसेच इतर अनुषंगिक सेवाविषयक बाबींची पूर्तता करित आहेत. त्यांनी ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याने, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ३९ अपवाद १ (ए) (एक) मधील तरतुदीनुसार त्यांचा “सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)” पदाचा ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.०५.०४.२०१६ (म.नं.) पासून संपुष्टात आणण्यात येऊन त्यांची “सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)” (वेतनसंरचना पीबी-३, रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.६,६००) पदावर दि.०६.०४.२०१६ (म.पू.) पासून नियमित नियुक्ती करण्यात येत आहे.

०२. सदरचे आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९ फेब्रुवारी, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१८०६१८१४४३२७१८२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vishnu Shripati Patil

Digitally signed by Vishnu Shripati Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21ebe4508a75a767041512feeaa6b8f2d5bc8caf857fe02cd29ce4bbb772da09, serialNumber=f8a0fc598f692587efafe9bd62df9e449fdf81c803c27adf1782c97c76ebcba5, cn=Vishnu Shripati Patil
Date: 2018.06.21 12:02:01 +05'30'

**( विष्णू पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्री. श्रीकांत मारुतीराव देशमुख, सहायक संचालक, नगर रचना, सातारा शाखा, सातारा यांना **(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)**

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.

६. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(०३-प्रती)**

७. सह संचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे.

८. सहायक संचालक, नगर रचना, सातारा शाखा, सातारा.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.

१०. निवडनस्ती / नवि-२७.

*****